राज्यातून व विभागीय परीक्षा मंडळातून इयत्ता १० वी व १२ वी च्या परिक्षेत सर्वप्रथम येणा-या विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या तसेच इतर मागास वर्ग प्रवर्गाच्या विद्यार्थी व विद्यार्थीनींना स्व.वसंतराव नाईक गुणवत्ता पुरस्कार प्रदान करण्यासाठी कार्यक्रमाचे आयोजन करणेबाबत.

महाराष्ट्र शासन

**इतर मागास वर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग,विमुक्त जाती भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक : पुरस्कार २०१९/प्र.क्र.७७ /शिक्षण,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : २६ फेब्रुवारी, २०२०.

वाचा : समक्रमांकीत शासन निर्णय दि. १५ फेब्रुवारी, २०२०.

प्रस्तावना:-

राज्यातून व विभागीय परीक्षा मंडळातून इयत्ता १० वी व १२ वी च्या परिक्षेत सर्वप्रथम येणा-या विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या तसेच इतर मागास वर्ग प्रवर्गाच्या विद्यार्थी व विद्यार्थीनींना स्व.वसंतराव नाईक गुणवत्ता पुरस्कार प्रदान करण्याचा कार्यक्रम दि.२४ मार्च, २०२० रोजी आयोजित करण्यात आला आहे.

२. सदर कार्यक्रमाचे आयोजन सुरळीतपणे पार पाडण्याच्या दृष्टीने विविध समित्या गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातून व विभागीय परीक्षा मंडळातून इयत्ता १० वी व १२ वी च्या परिक्षेत सर्वप्रथम येणा-या विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या तसेच इतर मागास वर्ग प्रवर्गाच्या विद्यार्थी व विद्यार्थीनींना स्व.वसंतराव नाईक गुणवत्ता पुरस्कार प्रदान करण्याचा कार्यक्रम सुरळीतपणे पार पाडण्याच्या दृष्टीने खालील प्रमाणे समित्या गठीत करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**१) कार्यक्रम संनियंत्रण समिती :-**

या कार्यक्रमाचे आयोजन करण्याकरिता गठीत केलेल्या वेगवेगळ्या समितींना व संबंधित अधिका-य्रांना दिलेली कामे व्यवस्थितपणे पार पाडण्याचे दृष्टीने वेळोवेळी संबंधित समित्यांना कामसंबंधी आवश्यक ते मार्गदर्शन व सूचना करण्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यक्रम संनियंत्रण समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-यांचे नांव व पदनाम | समितीवरील पद |
|---|---|---|
| १. | श्री. भा.र.गावीत, सह सचिव, इमाव,साशैमाप्र,विजाभज,आणि विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | श्री.र.व.गुरव, उप सचिव, इमाव,साशैमाप्र,विजाभज,आणि विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सह अध्यक्ष |
| ३. | श्री. बाळासाहेब साळुंखे, उप आयुक्त, समाज कल्याण, कोकण भवन | सदस्य |
| ३. | श्री. यशवंत मोरे, सेवानिवृत्त उपायुक्त, समाज कल्याण | सदस्य |
| ४. | श्रीमती शोभा कुलकर्णी, सेवानिवृत्त उपायुक्त, समाज कल्याण | सदस्य |
| ५. | श्री.आनंद लोमटे, उप महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य इतर मागास वर्ग वित्त व विकास महामंडळ, मुंबई. | सदस्य् सचिव |

सदर कार्यक्रम सनियंत्रण समिती, या कार्यक्रमाशी संबंधीत नियुक्त केलेल्या समित्यांशी समन्वय साधूनतसेच वेगवेगळ्या अधिकारी/कर्मचारी यांच्याशी संपर्क साधून सदर कार्यक्रम सुरळीतपणे पार पाडण्याच्या दृष्टीने काम करेल तसेच कार्यक्रमाच्या आयोजनासंबंधी केलेल्या कार्यवाहीबाबत अहवाल प्रधान सचिव (विजाभज), मंत्रालय, मुंबई यांना सादर करतील.

**२) कार्यक्रम व्यवस्थापन समिती :-**

या कार्यक्रमाचे आयोजन करण्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यक्रम व्यवस्थापन समिती गठीत करण्यात येत आहे. ही समिती या क्रयाक्रमासाठी येणा-या विद्यार्थी, विद्यार्थीनींची राहण्याची व्यवस्था करेल. तसेच त्यांच्या निवासाच्या ठिकाणी आणि कार्यक्रमस्थळी नेण्याची व्यवस्था करेल.

| अ.क्र. | अधिका-यांचे नांव व पदनांव | समितीवरील पद |
|---|---|---|
| १. | श्री. प्रसाद खैरनार, सहायक आयुक्त, समाजकल्याण, ठाणे | अध्यक्ष |
| २. | श्री. अजित जगताप, कक्ष अधिकारी, इमाव, साशैमाप्र, विजाभज, आणि विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |

१) **रंगमंच व्यवस्थापन, पुरस्कार, प्रमाणपत्र ,स्मृतिचिन्ह** :-

कार्यक्रमाच्या स्टेजवरील बॅकड्रॉप (बॅनर) तयार करणे तसेच कार्यक्रमाची जाहिरात देण्याबाबतचे काम हीसमिती करेल. या कार्यक्रमाच्या ठिकाणी म्हणजेच यशवंतराव प्रतिष्ठान, मुंबई येथील कार्यक्रमस्थळी रंगमंच व्यवस्या, मान्यवरांचे स्वागत, मान्यवरांना पुष्पगुच्छ, श्रीफळ इ. देण्यासंबंधी व त्या अनुषंगिक सर्व व्यवस्थापन काम सदर समिती करेल. तसेच या कार्यक्रमासाठी येणा-या विद्यार्थी, विद्यार्थीनींना द्यावयाच्या रोख रक्कमेचा धनादेश तसेच प्रमाणपत्र,स्मृतिचिन्ह या बाबत आणि या कार्यक्रमाची जाहिरात, निमंत्रितांची यादी निश्चित करणे आणि अन्य अनुषंगिक कामांचे व्यवस्थापन करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-यांचे नांव व पदनांव | समितीवरील पद |
|---|---|---|
| १. | श्री.योगेश पाटील, सहायक आयुक्त, समाज कल्याण, पालघर | अध्यक्ष |
| २. | श्री.श्रीनाथ हेंद्रे, कक्ष अधिकारी, इमाव,साशैमाप्र,विजाभज,आणि विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ३. | श्री. अजित जगताप, कक्ष अधिकारी, इमाव,साशैमाप्र,विजाभज,आणि विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |

**४) वित्त विषयक समिती:-**

या कार्यक्रमासाठी येणा-या खर्चाबाबत ही समिती नियंत्रण ठेवेल. कार्यक्रमासाठी वेगवेगळ्या बाबीसाठी होणारा खर्च या समितीमार्फत केला जाईल. सदर समिती पुढीलप्रमाणे असेल.

| अ.क्र. | अधिका-यांचे नांव व पदनांव | समितीवरील पद |
|---|---|---|
| १. | श्री.रविंद्र गुरव, उप सचिव, इमाव,साशैमाप्र,विजाभज,आणि विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | श्री.समीर पालकर, इमाव,साशैमाप्र,विजाभज,आणि विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ३. | श्री.भगतकर, लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त व विकास महामंडळ, मुंबई | सदस्य |

वरीलप्रमाणे २ ते ४ येथील समित्यावर आवश्यकतेनुसार सदस्य नियुक्त करावेत तसेच आवश्यक अधिकारी व कर्मचारी यांच्या सेवा उपलब्ध करून घेण्याचे अधिकार समितीच्या अध्यक्षांना असतील. त्यानी त्यांच्या सोईनुसार त्यांना सोपवून दिलेल्या कामानुसार अधिकारी व कर्मचारी यांच्या सेवा उपलब्ध करून घ्याव्यात.

वरील समित्यांनी कार्यक्रमासंदर्भात केलेल्या कार्यवाहीबाबत दैनंदिन अहवाल क्रमांक १ येथील कार्यक्रम संनियंत्रण समितीकडे रोजच्या रोज सादर करावा कार्यक्रम संनियंत्रण समिती अन्य समित्यांचा एकत्रित अहवाल प्रधाव सचिव(विजाभज) यांना सादर करेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००२२६१४४५२८७५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA
VASANTRAO GURAV

Digitally signed by RAVINDRA VASANTRAO GURAV
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=9dfb7aefbd9e82b129c324d567b46e1d853d93c38d6e222c868eac72ecd12784, ou=VJNT OBC AND SBC DEPT, o=GOVERNEMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA VASANTRAO GURAV
Date: 2020.02.26 14:49:51 +05'30'

**(रविंद्र गुरव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) प्रधान सचिव, इमाव,साशैमाप्र,विजाभज,आणि विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) संचालक, इमाव,साशैमाप्र,विजाभज,आणि विमाप्र कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) सर्व प्रादेशिक उपआयुक्त, समाजकल्याण
४) सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
५) महालेखापाल महाराष्ट्र १/२, ( लेखा व अनुज्ञेयता) ( लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर)
६) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८) लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा, मुंबई.
९) सह सचिव, इमाव,साशैमाप्र,विजाभज,आणि विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ,प्रशासकीय भवन, चौथा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर, मुंबई-४०० ०७१.
११) निवडनस्ती, शिक्षण.